**बाल न्याय कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी अनुदान वितरीत करण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

महिला व बाल विकास विभाग,
शासन निर्णय क्र.बीजीटी-२०११/प्र.क्र.३२०/का-८,
नविन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : ३० ऑगस्ट, २०११.

**वाचा :** शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अंदाज-२०११/प्र.क्र.९३/२०११/अर्थसंकल्प-३, दिनांक ६ मे, २०११.

**शासन निर्णय :** सन २०११-२०१२ या आर्थिक वर्षाकरीता बाल न्याय कार्यक्रमासाठी योजनातंर्गत (Plan) राज्य शासनाचा ५०% हिस्सा म्हणून रु. १५,००,००,०००/- इतकी तरतूर करण्यात आली आहे. या तरतूदीपैकी ७५% तरतूद रु. ११,२५,००,०००/- (अक्षरी रुपये अकरा कोटी पंचवीस लक्ष फक्त) इतकी वितरीत करण्यात आली आहे. सदर निधीपैकी वित्त विभागाच्या सहमतीने रु. ३,००,००,०००/- (अक्षरी रुपये तीन कोटी फक्त) तरतूद वितरीत करण्यास या विभागाची मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधीचे नियंत्रण करण्यासाठी नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे व संबंधीत जिल्हयाचे जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांना आहंरण व संवितरण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे. रु. ३,००,००,०००/- (अक्षरी रुपये तीन कोटी फक्त) इतका बाल न्याय कार्यक्रम अंतर्गत ५०% राज्य शासनाचा हिस्सा या बाबींसाठी खर्च होईल, व त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करणे, याची दक्षता आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांनी घ्यावी.

३. सदर रक्कम मागणी क्र.एक्स-१, योजनांतर्गत २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२, समाजकल्याण, १०२, बालकल्याण, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, केंद्र पुरस्कृत योजना (१०) (०४) बाल न्याय कार्यक्रम (राज्य हिस्सा ५०%) (२२३५-३४१-७) ३१-सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली सन २०११-१२ मध्ये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या तरतूदीतून खर्च करण्यात यावी.

४. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र/१०.८०/प्र.क्र.७०/२००८/विनिमय, दिनांक १५.५.२००९ भाग पहिला, उपविभाग-३ / परिच्छेद २७ (२) (ब) अन्वये विभागाला प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन वित्त विभागाच्या सहमतीने त्यांचा अनौपचारिक संदर्भ क्र.४८४/११/व्यय-६, दिनांक २४.८.२०११ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( शं. शा. पढाळ )
**शासनाचे उप सचिव**

**प्रत,**
आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
महालेखापाल, १/२ (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई शहर / मुंबई उपनगर.
वरिष्ठ जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी.
नियोजन विभाग, मादाम कामा रोड, मंत्रालय, मुंबई.
वित्त विभाग (व्यय-६), (अर्थसंकल्प-६), मादाम कामा रोड, मंत्रालय, मुंबई.
अवर सचिव, (अर्थसंकल्प, महिला व बाल विकास विभाग, मादाम कामा रोड, मंत्रालय, मुंबई.
महिला व बाल विकास विभागातील सर्व अधिकारी व कार्यासने.
निवड नस्ती/का-८